**राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेंतर्गत सन २०२३-२४ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२३/प्र.क्र.१७४/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ७ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३.

२. प्रधान मुख्य वनसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे दि.२५.०४.२०२३, दि.१३.०६.२०२३, दि.२७.०७.२०२३, दि. २३.०८.२०२३, दि. ३०.०८.२०२३, दि. २०.०९.२०२३, दि. २८.०९.२०२३, दि. ६.१०.२०२३, दि. ३१.१०.२०२३, दि. ३.११.२०२३, दि. २४.११.२०२३, दि. ११.१२.२०२३, दि. १९.१२.२०२३, दि. २०.१२.२०२३, दि. २१.१२.२०२३, दि. २२.१२.२०२३, दि. २७.१२.२०२३, दि. ८.०१.२०२४, दि. १९.०१.२०२४, दि. २३.०१.२०२४, दि. १.०२.२०२४ व दि.९.०२.२०२४

३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दिनांक ६.०७.२०२३, दिनांक २४.०८.२०२३, दिनांक २५.०९.२०२३, दिनांक २.११.२०२३, शुध्दीपत्रक दिनांक ३.११.२०२३ व दिनांक २.०२.२०२४.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. ४.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

"राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सीमांकन" (४४०६ ००५३) या राज्य योजनेअंतर्गत सन २०२३-२४ साठी एकूण रु. ८०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. आता, सुधारीत अंदाजानुसार (Revise Estimate) एकूण रु. ६५३६.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. प्रस्तुत योजनेअंतर्गत रक्कम रु. ९५०३.७५ लक्ष निधी मागणीचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. मागणी केलेल्या एकूण रक्कम रु. ९५०३.७५ लक्ष निधीपैकी रक्कम रु. ५३४३.८६ लक्ष निधी या विभागाच्या संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक ४.०३.२०२४ अन्वये सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार ०२- मजूरी या उद्दिष्टांसाठी अर्थसंकल्पित निधीच्या १०० टक्के निधी वितरणाची तरतूद उपलब्ध असून २७ - लहान बांधकाम व ५३ - मोठी बांधकामे या उद्दिष्टांमधील कार्यक्रमांतर्गत खर्चाचे निधी वितरणासाठी नियोजन विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या निधी वितरणासाठी वित्त विभागाची मान्यता आवश्यक असल्याचे नमूद केले आहे.

४. आता, या योजनेअंतर्गत सुधारीत अंदाजानुसार (Revise Estimate) सद्य:स्थितीत उपलब्ध रु. ३६१.२४ लक्ष (०२- मजूरी ३६१.२४ लक्ष, २७ - लहान बांधकाम ०.० लक्ष व ५३- मोठी बांधकामे ०.०० लक्ष) निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ करिता "राखीव वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन" (४४०६ ००५३) या योजनेअंतर्गत सुधारित अंदाजपत्रकाच्या मर्यादेत उपलब्ध निधीतून एकूण रु. ३६१.२४ लक्ष निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र | वनवृत्त | वन विभाग | कामाचा तपशिल | ०२-मजूरी | २७ - लहान बांधकाम | ५३- मोठी बांधकामे | वितरित रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | नागपूर | भंडारा | वनहद्दीचे सर्व्हे करुन काँक्रीट बांऊड्री पिल्लर्स उभारणे | २.११ | ० | ० | २.११ |
| २ | धुळे | जळगाव | | ३५.४१ | ० | ० | ३५.४१ |
| ३ | कोल्हापूर | सातारा | | २६.२३ | ० | ० | २६.२३ |
| ४ | अमरावती | अमरावती | रोवर व बेस स्टेशन खरेदी करीता, टोटल स्टेशन खरेदी, भूमी अभिलेख विभागाकडून तातडीची मोजणी फी रक्कम. | ७.३० | ० | ० | ७.३० |
| ५ | पश्चिम मुंबई (वन्यजीव) | संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली | वनहद्दीतील संरक्षक भिंत बांधणे | ८०.८४ | ० | ० | ८०.८४ |
| ६ | छत्रपती संभाजीनगर | नांदेड | वनहद्दीचे सर्व्हे करुन काँक्रीट बांऊड्री पिल्लर्स उभारणे. | २५.४५ | ० | ० | २५.४५ |
| ७ | ठाणे | डहाणू | | ४२.९१ | ० | ० | ४२.९१ |
| ८ | | जव्हार | DGPS Survey करणे | ५५.५७ | ० | ० | ५५.५७ |
| ९ | | शहापूर | वनहद्दीचे सर्व्हे करुन काँक्रीट बांऊड्री पिल्लर्स उभारणे | ६६.१४ | ० | ० | ६६.१४ |
| १० | पश्चिम मुंबई (वन्यजीव) | ठाणे (वन्यजीव) | | १९.२८ | ० | ० | १९.२८ |
| | एकूण | | | **३६१.२४** | ० | ० | **३६१.२४** |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा

२) या मध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दि. ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही आर्थिक वर्ष २०२३-२४ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.

५) सदर बांधकाम करताना वन (संवर्धन एंव संरक्षण) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

६) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

७) आर्थिक वर्षाअखेर वितरीत निधी आणि अखर्चित निधीची पडताळणी करण्यात अखर्चित निधी तातडीने शासनखाती जमा करण्यात यावा.

८) निधी वितरीत करताना प्रस्तुत कामे दुबार होत नसल्याची खातरजमा करावी.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२३-२४ मध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ व दिनांक ४.०३.२०२४ च्या तरतूदींस तसेच शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१५२२३९२२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVIKIRAN SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=223dbaf509e56a22dd8c9d33c199767837144d5824e7011745d9a521fdbedad3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2024.03.07 15:32:47 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय)**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई /नागपूर .
६) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर/ठाणे/अमरावती/छत्रपती संभाजीनगर /नागपूर/धुळे.
७) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
८) वनसंरक्षक तथा संचालक संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
९) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१०) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-६ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.